**महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा), गट-अ मधील शिक्षणाधिकारी पदावर कार्यरत अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन करण्याकरिता प्रतिवेदन अधिकारी व पुनर्विलोकन अधिकारी घोषित करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बैठक-४११८/प्र. क्र. ७०/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०८ जून, २०१८

**प्रस्तावना:-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अखत्यारीमध्ये शिक्षणाधिकारी (प्राथमिक) हे जिल्हयातील प्राथमिक शिक्षणासाठी प्रशासनाचे प्रमुख म्हणून काम पाहतात, तर त्याच जिल्ह्यात माध्यमिक शिक्षणाचे काम शिक्षणाधिकारी (माध्यमिक) पार पाडतात. शिक्षणाधिकारी हे प्रशासन शाखेतील पद असले तरी विद्यार्थ्यांच्या गुणवत्तापूर्ण शिक्षणाची जबाबदारी ही प्रत्येक शिक्षणाधिकाऱ्याची आहे. जिल्ह्यातील विद्यार्थ्यांच्या प्राथमिक शिक्षणाची जबाबदारी ही शिक्षणाधिकारी (प्राथमिक) यांची आहे व जिल्ह्यातील विद्यार्थ्यांच्या माध्यमिक शिक्षणाची जबाबदारी ही शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांची आहे. ज्या जिल्ह्यात शिक्षणाधिकारी (निरंतर) हे पद आहे, त्या जिल्हयातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची जबाबदारी ही शिक्षणाधिकारी (निरंतर) यांची आहे.

२. राज्यातील प्रत्येक विद्यार्थ्याला गुणवत्तापूर्ण शिक्षण देण्याकरीता विद्यार्थ्यांना तसेच शिक्षकांना प्रशिक्षण देणे, मार्गदर्शन करणे, आढावा घेणे ही जबाबदारी जिल्हा शैक्षणिक सातत्त्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्थेची आहे. सध्या पालघर व मुंबई (शहर व उपनगरे) हे २ जिल्हे वगळता अन्य ३३ ठिकाणी जिल्हा शैक्षणिक सातत्त्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था कार्यरत आहे. त्याचे प्रमुख पद प्राचार्याकडे आहे. शिक्षण सक्षमीकरण शाखेतील सदर प्राचार्य हे पद प्रशासन शाखेतील शिक्षण उपसंचालक दर्जाशी समकक्ष असून, त्यांची वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ६,६०० इतकी आहे, तर शिक्षणाधिकारी पदाची वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे रु. ५,४०० इतकी आहे.

३. प्रचलित पध्दतीमध्ये शिक्षणाधिकारी यांचे गोपनीय अहवाल (कार्यमूल्यमापन अहवाल) जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी प्रतिवेदीत करतात व त्या शैक्षणिक विभागातील विभागीय शिक्षण उपसंचालक हे त्याचे पुनर्विलोकन करतात. तथापि, सदर कार्यपध्दती मध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

४. शिक्षणाधिकाऱ्यांचे शैक्षणिक कार्याशी संबंधित गोपनीय अहवाल प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्त्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था (जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था) यांच्या स्तरावरुन पुनर्विलोकीत होणे आवश्यक आहे. त्यामुळे शिक्षणाधिकारी यांचे गोपनीय अहवाल (कार्यमूल्यमापन अहवाल) लिहिण्याबाबत प्रतिवेदन अधिकारी व पुनर्विलोकन अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे .

**शासन निर्णय**-

प्रचलित पध्दतीमध्ये शिक्षणाधिकारी यांचे गोपनीय अहवाल (कार्यमूल्यमापन अहवाल) जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी प्रतिवेदीत करतात व त्या शैक्षणिक विभागातील विभागीय शिक्षण उपसंचालक हे पुनर्विलोकीत करतात. सन २०१६-१७ या प्रतिवेदन वर्षापासून शिक्षणाधिकारी यांचे कार्यमूल्यमापन अहवाल महापार या ऑनलाईन प्रणालीद्वारे नोंदविण्यात येतात. त्यामध्ये कार्यमूल्यमापन विचारात घेऊन अधिकतम १० गुण देण्याची तरतूद आहे. प्रचलित कार्यपध्दतीमध्ये बदल करण्यात येत असून, शिक्षणाधिकाऱ्यांच्या प्रशासनिक कामकाजाच्या मूल्यमापनासाठी ५ गुण व शैक्षणिक कामकाजाच्या मूल्यमापनासाठी ५ गुण विभागून देण्यात येत आहेत. यापुढे शिक्षणाधिकारी यांचे प्रशासकीय कामकाजाचे व शैक्षणिक कामकाजाचे वेगवेगळे कार्यमूल्यमापन अहवाल संबंधित जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी प्रतिवेदीत करतील व त्यानंतर प्रशासकीय कामकाजाचे पुनर्विलोकन संबंधित विभागाचे विभागीय शिक्षण उपसंचालक व शैक्षणिक कामकाजाचे पुनर्विलोकन संबंधित जिल्हयातील जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्थेचे (जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था) प्राचार्य करतील. त्यामुळे शिक्षणाधिकारी पदावरील शिक्षणाधिकारी (प्राथमिक), शिक्षणाधिकारी (माध्यमिक) व शिक्षणाधिकारी (निरंतर) या अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन करण्याकरिता खालील अधिकाऱ्यांना प्रतिवेदन व पुनर्विलोकन अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

| | प्रशासनिक मूल्यमापन (कमाल गुण ५) | शैक्षणिक मूल्यमापन (कमाल गुण ५) |
|---|---|---|
| प्रतिवेदन अधिकारी | मुख्य कार्यकारी अधिकारी | मुख्य कार्यकारी अधिकारी |
| पुनर्विलोकन अधिकारी | विभागीय शिक्षण उपसंचालक | प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था (जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था) |

२. मुंबई जिल्हयात कार्यरत शिक्षण निरीक्षकांचे शैक्षणिक व प्रशासकीय कार्याचे कार्यमूल्यमापन करण्याकरिता खालीलप्रमाणे प्रतिवेदन व पुनर्विलोकन अधिकारी घोषित करण्यात येत आहे :-

| | प्रशासनिक मूल्यमापन (कमाल गुण ५) | शैक्षणिक मूल्यमापन (कमाल गुण ५) |
|---|---|---|
| प्रतिवेदन अधिकारी | शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई | प्राचार्य, प्रादेशिक विद्या प्राधिकरण, मुंबई. |
| पुनर्विलोकन अधिकारी | शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. | शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण) पुणे. |

३. पालघर जिल्ह्यांमध्ये जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था (जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था) कार्यरत नसल्यामुळे सदर संस्था कार्यरत होईपर्यंत पालघर जिल्हयातील शिक्षणाधिकाऱ्यांचे शैक्षणिक मूल्यमापन करण्याकरीता प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, ठाणे यांना पुनर्विलोकन अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१८०६१२१७०९४४४६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2018.06.13 12:23:05 +05'30'

**(र. प्र. आटे)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे.
३) सर्व शिक्षण संचालक.
४) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
५) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य, परिक्षा परिषद, पुणे.
६) सर्व विभागीय अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ.
७) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
८) सर्व प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सात्तत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था.
९) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/निरंतर शिक्षण/ शिक्षण निरीक्षक)

**प्रत माहितीसाठी**

१) मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी.
२) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
३) निवडनस्ती